**<u>वार्षिक योजना सन २०१४-१५.</u>**

राज्यस्तरीय आदिवासी उपयोजने अंतर्गत विदर्भातील सर्व जिल्हयात बांबु लागवडीची कामे घेणेबाबत चालू बाब प्रस्ताव.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एफडीएम-२०१४/प्र.क्र.१६३/फ-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
तारीख: १० मार्च, २०१५

**<u>वाचा :-</u>**

१) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.०८/(१४-१५)/४९७/१४-१५, दि.२५.०६.२०१४
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र. अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थसंकल्प-३, दि.०१.०७.२०१४
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य नागपूर यांचे पत्र, क्र.कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.०८/(१४-१५)/१३६०/१४-१५, दि.२०.११..२०१४
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र. पूरक-२०१४/प्र.क्र.५८९/अर्थसंकल्प-३, दि.०१.०१.१५
५) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र. अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि.०२.०१.१५
६) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. बीयुडी-२०१४/प्र.क्र.१६/कार्यासन.६, दि.२.०३.२०१५

**<u>प्रस्तावना :-</u>**

सन २०१४-१५ करिता राज्यस्तरीय आदिवासी उपयोजनेंतर्गत विदर्भातील सर्व जिल्ह्यांमध्ये बांबू लागवड करणे (४४०६ ०२८७) या योजनेअंतर्गत एकूण रु.१२५०.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. सदरहू अर्थसंकल्पित नियतव्ययाच्या अनुषंगाने रु.६४६.८२ लक्ष इतक्या रक्कमेचा बांधील कामांचा चालू बाब प्रस्ताव संदर्भ क्र.१ वरील दि.२५.०६.२०१४ रोजीच्या पत्रान्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी शासनास मंजूरीस्तव सादर केलेला आहे.

आदिवासी विकास विभागाने संदर्भ क्र. ६ वरील दि. २.०३.२०१५ च्या शासन निर्णयान्वये सन २०१४-१५ करिता सदरहू लेखाशिर्षा अंतर्गत अर्थसंकल्पित असलेल्या रु.१२५०.०० लक्ष इतक्या निधीपैकी रु.३८८.०९ लक्ष इतकी रक्कम वन विभागाकडे सुपूर्द केलेली आहे.

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.३ वरील दि.०२.०१.२०१५ च्या परिपत्रकानुसार चालू बाब प्रस्तावास अर्थसंकल्पित निधीच्या ६० % च्या मर्यादेत खर्च करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. त्याअनुषंगाने अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी एकूण ७५६७.६० हेक्टर क्षेत्रावर बांधील कामे करण्याकरिता शासनास सादर केलेल्या रु.६४६.८२ लक्ष

रक्कमेच्या प्रस्तावाचे ६० % प्रमाणे रु.३८८.०९ लक्ष निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.१ वरील दि.२५.०६.२०१४ रोजीच्या पत्रान्वये शासनास सादर केलेला प्रस्ताव वित्त विभागाच्या संदर्भ क्र.५ येथिल दि.०२.०१.२०१५ च्या परिपत्रकातील सूचना विचारात घेता सन २०१४-१५ करिता राज्यस्तरीय आदिवासी उपयोजनेंतर्गत विदर्भातील सर्व जिल्ह्यातील बांबू लागवड करणे या **योजनेअंतर्गत प्रस्तावांतर्गत रु.६४६.८२ लक्ष रक्कमेपैकी रु.३८८.०९ लक्ष (०२मजुरी - ३४७.६३ लक्ष व २१ सा.पुरवठा - ४०.४६ लक्ष, एकूण = ३८८.०९ लक्ष)** इतका निधी वितरित व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधी या विभागाकडून मंजूर केलेल्या प्रस्तावातील क्षेत्र / कार्यक्रम / कामे यावरच खर्च होईल व कामाची द्विरुक्ती होणार नाही आणि मंजूर कामांव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर /नवीन क्षेत्रावर/ नवीन कामांवर खर्च करण्यात येणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच सदरहू निधी वितरित करण्यापूर्वी प्रस्तावानुसार योजनेतील निश्चित केलेल्या कामांना सक्षम अधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी असल्याची व त्याचबरोबर सध्या वाटप करण्यात येणा-या अनुदानातून खर्च करताना यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी. त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दि.०१.०७.२०१४ रोजीच्या शासन परिपत्रकातील अटी व शर्तींची पूर्तता करण्यात येईल याची देखिल दक्षता घ्यावी.

सदर योजनेवर होणारा खर्च मागणी क्र.टी-०६, प्रधान शीर्ष ४४०६, वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-०१, सामाजिक व कृषि क्षेत्र वनीकरण-७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०२) सर्वसाधारण उपयोगाची झाडे लावणे (४४०६ ०२८७) या लेखाशिर्षाखाली सन २०१३-१४ मध्ये उपलब्ध होणाऱ्या अनुदानामधून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.३७/व्यय-१०, दि.३०.०१.२०१५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीस अनुसरुन आणि वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र/१००८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दिनांक १५.०५.२००९ भाग

पहिला, उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१०१७३८१६५५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.03.10 17:49:07 +05'30'

**(द.ल.थोरात)**
सह सचिव
महसूल व वन विभाग

**प्रति :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) सर्व मुख्य वनसंरक्षक (प्रा.),गडचिरोली, चंद्रपूर, यवतमाळ, नागपूर, अमरावती
४) मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्रसंचालक, ताडोबा अंधारी व्याघ्रप्रकल्प, चंद्रपूर
५)महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
६) सह सचिव /उप सचिव, वित्त विभाग (अर्थ-३)/(व्यय-१०/व्यय-१४), मंत्रालय, मुंबई-३२.
७) उप सचिव, नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
८) उप सचिव, आदिवासी विकास विभाग (का-६/का-१४), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
९) जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर/गडचिरोली/यवतमाळ /अकोला /अमरावती/ नागपूर/ वर्धा/भंडारा/गोंदिया.
१०) ब-१ कार्यासन, म.व व.वि.,मंत्रालय,मुंबई-३२.
११) निवडनस्ती , फ-२ कार्यासन,म. व व.वि,.मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.